**पुणे जिल्हयातील हडपसर पोलीस ठाणे गु.र.नं.२९८/२०१३ (सेशन केस क्र. ८५३/२०१३) या गुन्ह्यामधून उद्भवणा-या खटल्यामध्ये शासनाची बाजु मांडण्याकरीता विशेष सरकारी अभियोक्ता म्हणून नियुक्त करण्यात आलेल्या ॲड श्री. उज्वल निकम यांना व्यवसायीक फी मंजुर करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**गृह विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः एसपीपी १०१६/प्र.क्र.२५८/पोल-१०**

गृह विभाग, २ रा मजला, मंत्रालय,
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा रोड,
मुंबई-४०० ०३२
दिनांक : १८ एप्रिल, २०१७

**संदर्भ :-** शासन अधिसूचना, विधी व न्याय विभाग क्र. एसपीपी २०१६/यु.ओ.आर.८७/डी-१४, दिनांक २२ नोव्हेंबर, २०१६,

**शासन निर्णय :-**

पुणे जिल्हयातील हडपसर पोलीस ठाणे, गु.र.क्र. २९८/२०१३ (सेशन केस क्र. ८५३/२०१३) मधून उद्भवणा-या न्यायालयीन प्रकरणांमध्ये शासनाच्या वतीने कामकाज पहाण्यासाठी ॲड. श्री. उज्वल निकम यांची विधी व न्याय विभागाच्या वरील संदर्भाधीन दिनांक २२ नोव्हेंबर, २०१६ च्या अधीसूचनेद्वारे विशेष सरकारी अभियोक्ता म्हणून नियुक्ती करण्यात आली आहे. सबब, प्रस्तुत प्रकरणी ॲड. श्री. उज्वल निकम, विशेष सरकारी अभियोक्ता यांना खालीलप्रमाणे फी अदा करण्यास या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात येत आहे.

| | | |
|---|---|---|
| अ) प्रतिदिन परिणामकारक सुनावणी फी | - | रु. ३५, ०००/- |
| ब) विचारविनिमय फी (प्रतितास)<br>(कमाल मर्यादा प्रतिदिन ३०,०००/-) | - | रु. १०, ०००/- |
| क) हॉटेल लॉजिंग व बोर्डिंग प्रतिदिन | - | रु. ५,०००/- |

२. परिणामकारक सुनावणीचे दिवस संबंधीत प्रकरणाच्या पर्यवेक्षीय पोलीस उपायुक्त दर्जाहून कमी नाही, अशा अधिकाऱ्याकडून प्रमाणित करुन घेण्यात यावेत व कोणत्याही प्रकारचे अतिरिक्त प्रदान होणार नाही, याची दक्षता घ्यावी. तसेच, प्रस्तुत प्रकरणी ॲड. श्री. उज्वल निकम, विशेष सरकारी अभियोक्ता यांना अपरिणामकारक सुनावणी फी अथवा अन्य कोणतीही फी वा भत्ता अनुज्ञेय असणार नाही.

३. यासाठी येणारा खर्च या विभागाच्या मागणी क्र. बी-१, २०५५ पोलीस - (००) १०९, जिल्हा पोलीस (००) (०१) जिल्हा पोलीस दल - (२०५५ ०१६८) - २८ व्यावसायिक सेवा या लेखाशीर्षाखालील त्या त्या आर्थिक वर्षाच्या मंजूर अनुदानातून व मासिक निधी विवरणपत्रानुसार भागविण्यात येईल.

४. हा शासन निर्णय वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र. ५४९/१७/व्यय-७, दिनांक १७.१२.२०१६ अन्वये मिळालेल्या सहमतीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०४१८१५२८३२७२२९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Arun Vishnupant Joshi

Digitally signed by Arun Vishnupant Joshi
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Home Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=25b1cd893dfd4dc594def1c4642465ecdafbdae899f879d9b4603fe37cfb3598, cn=Arun Vishnupant Joshi
Date: 2017.04.18 15:31:06 +05'30'

**(अ.वि.जोशी)**
कक्ष अधिकारी,गृह विभाग, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
२. पोलीस आयुक्त, पुणे.
३. महालेखापाल१- (लेखा व अनुज्ञेयता / लेखा परीक्षा), महाराष्ट्र राज्य, मुंबई .
४. अधिदान व लेखाधिकारी, मुंबई.
५. निवासी लेखा अधिकारी, मुंबई.
६. ॲड.श्री. उज्वल निकम, बॅरिस्टर निकम चाळ, रामदास कॉलनी, जळगाव.
७. विधी व न्याय विभाग (का १४), मंत्रालय, मुंबई.
८. वित्त विभाग (व्यय- ७), मंत्रालय, मुंबई.
९. निवड नस्ती (पोल-१०).